आदिवासी क्षेत्र उपयोजना सन २०१५-१६ करीता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या केंद्रिय योजनांतर्गत तरतूदींचे वितरण - भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (२२२५ २२८२)

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१५/प्र.क्र.०८/कार्यासन-६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२.
तारीख: १९ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

**१) वि.वि.शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थ-३, दि. ३०.०३.२०१५**
**२) वि.वि.शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५**
**३) वि.वि.शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि.२४.०७.२०१५**
**४) जनजाती कार्यमंत्रालय, भारत सरकार चे पत्र क्र.२००१४/१६/१२-शिक्षण, दि.२४.०९.२०१५**
**५) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.भासशि-२०१५/प्र.क्र.११९/कार्या-१२**

## शासन निर्णय-

आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्रमांक टि-५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण केंद्रिय योजना (०२) (०९) भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (२२२५ २२८२), ३४ शिष्यवृत्त्या व विद्यावेतने करिता एकूण रु.१४०००.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. यापैकी वाचा क्रमांक ४ नुसार एकूण रु.५२०९.८३ लक्ष तरतूद केंद्र सरकारने पहिल्या हप्प्यासाठी वितरीत केली आहे.

२. वाचा क्र.५ नुसार सदर केंद्रिय निधी राज्यशासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले आहे. त्यामुळे सदर एकूण रु.५२०९.८३ लक्ष (रु. पाच हजार दोनशे नऊ लक्ष त्र्याऐंशी हजार) तरतूद नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वाचा क्र.२ मधील अटी व शर्तीची पूर्तता करत असल्याने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रक अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उदिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठविण्याबाबत सूचना देण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५ नुसार प्राप्त अधिकार तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ १६३/अर्थोपाय दि. १३.१०.२०१५ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१९१७४१०१२१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2015.10.19 17:46:01 +05'30'

**भगवान सावंत**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
३. सर्व सहसचिव / उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
४. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय ग्रंथाल, विधानभवन, मुंबई.
६. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.निवडनस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.